बनावट मुद्रांक घोटाळ्यासंदर्भात स्थापन करण्यात आलेले विशेष मोका न्यायालय, पुणे व येरवडा मध्यवर्ती कारागृह पुणे या दरम्यान व्हिडीओ कॉन्फरन्सिंग सेवा सुरु करण्याबाबत..

महाराष्ट्र शासन
गृह विभाग
शासन पुरकपत्र क्र. एमआयएस २००४/प्र.क्र.१४५/पीआरएस-२
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दि. ३ मार्च, २००५

वाचा:- १) शासन निर्णय गृह विभाग क्र.एमआयएस २००४/प्र.क्र.१४५/पीआरएस-२, दि.१४ फेब्रुवारी, २००५.
२) पोलीस अधीक्षक, सीबीआय, मुंबई आणि पर्यवेक्षक अधिकारी, सीबीआय, मुंबई यांचे पत्र क्र.८१, दि.३.२.२००५.

शासन पुरकपत्र:- शासन निर्णय गृह विभाग, क्र.एमआयएस २००४/प्र.क्र.१४५/पीआरएस-२, दिनांक १४ फेब्रुवारी, २००५ अन्वये सर्वोच्च न्यायालय, नवी दिल्ली येथे दाखल असलेल्या याचिका क्र.५२२/२००३ व इतर संदर्भात मा.न्यायालयाने दिलेल्या आदेशाच्या अनुषंगाने बनावट मुद्रांक घोटाळ्यासंदर्भात स्थापन करण्यात आलेले विशेष मोका न्यायालय, पुणे व येरवडा मध्यवर्ती कारागृह, पुणे या दरम्यान व्हिडीओ कॉन्फरन्सिंग सेवा सुरु करण्यास प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. याकरीता येणा-या रु.१,७४,२००/- (रुपये एका लाख चौ-याहत्तर हजार दोनशे फक्त) इतका खर्च मागणी क्र.बी-५, २०५६-तुरुंग, १०१ तुरुंग (००) (०१) मध्यवर्ती कारागृह-०५ कार्यालयीन खर्च या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यास मंजूरी देण्यात आली आहे.

२. पोलीस अधीक्षक, सीबीआय, मुंबई यांनी त्यांच्या दि.३.२.२००५ च्या पत्रान्वये व्हिडीओ कॉन्फरसिंग सेवा अ) विशेष मोक्का न्यायालय, पुणे व येरवडा मध्यवर्ती कारागृह, पुणे, ब) येरवडा मध्यवर्ती कारागृह, पुणे व विशेष न्यायालय बंगलोर आणि, क) येरवडा मध्यवर्ती कारागृह, पुणे व बनावट मुद्रांक घोटाळा संदर्भातील प्रकरणाशी संबंधीत सत्र न्यायालय, मुंबई या दरम्यान व्हिडीओ कॉन्फरन्सिंग सेवा सुरु करण्याबाबत कळविले आहे. त्यानुसार उपरोक्त नमूद खर्चाच्या मर्यादेत अ) विशेष मोक्का न्यायालय, पुणे व येरवडा मध्यवर्ती कारागृह, पुणे, ब) येरवडा मध्यवर्ती कारागृह, पुणे व विशेष न्यायालय बंगलोर आणि क) येरवडा मध्यवर्ती कारागृह, पुणे व बनावट मुद्राक घोटाळयासंदर्भात प्रकरणांशी संबंधीत सत्र न्यायालय, मुंबई या दरम्यान व्हिडीओ कॉन्फरसिंग सुरु करण्यास शासन याद्वारे प्रशासकीय मान्यता देत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

आ.न.परदेशी
( आ. न. परदेशी )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन, गृह विभाग

प्रती,

• अतिरिक्त संचालक, सी.बी.आय., भारत सरकार, सी.जी.ओ.कॉम्प्लेक्स, ब्लॉक नं.३, बोधी

- पोलीस अधीक्षक, सी.बी.आय., मुंबई युनिट, किताब महल, ३ रा माळा, डॉ.डी.एन.रोड, फोर्ट, मुंबई-४०० ००१.
- सहाय्यक निदेशक (व्यवसाय विकास) मुख्य महाप्रबंधक दूरसंचार यांचे कार्यालय, भारत संचार निगम लि., फाऊंटन टेलीकॉम बिल्डींग, एम.जी.रोड, फोर्ट, मुंबई-४०० ००१.
- कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे.
- प्रबंधक, विशेष मोका न्यायालय, पुणे.
- प्रबंधक, सत्र न्यायालय, मुंबई.
- श्री.ध.ज.चौधरी, कारागृह उपमहानिरीक्षक, पश्चिम विभाग, पुणे तथा समन्वय अधिकारी.
- सर्व कारागृह उपमहानिरीक्षक.
- अधिक्षक, येरवडा मध्यवर्ती कारागृह, पुणे.
- महालेखापाल,(लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई-१.
- जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
- संचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नविन प्रशासन भवन, ५ वा मजला, मंत्रालयासमोर, मुंबई (दोन प्रती)
- अवर सचिव (बीयुडी-१), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
- वित्त विभाग, व्यय-८ / वित्तीय सुधारणा-१ / अर्थसंकल्प-३ / अर्थसंकल्प-१०, मंत्रालय, मुंबई-३२.
- निवड नस्ती, पीआरएस-२.

****